केवल गोकूळ दरवाजा, रामटेक, जि. नागपूर या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन दुरुस्ती कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक : स्मारक-२०२४/प्र.क्र.९१/सां.का.३**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १२ मार्च, २०२४.

**वाचा :-** संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांचे पत्र जा.क्र.स्मारके/२०२४/७८६, दि.२७.०२, २०२४

**प्रस्तावना** :-

नागपूर जिल्ह्यातील प्रभू श्रीरामांच्या पदस्पर्शाने पावन झालले शहर म्हणजे रामटेक होय. या रामटेक शहरात गिरिशिखरावरील श्री रामास्वामी मंदीर संकूल हे भाविक व पर्यटक यांचे आकर्षणाचे केंद्र आहे. या स्थळाचे ऐतिहासीक महत्व ओळखून गडमंदिर रामटेक येथील श्री रामास्वामी मंदीर संकूल परिसरातील स्मारके (मंदिर व दरवाजे) राज्य संरक्षित स्मारके म्हणून घोषीत केलेली आहेत. राज्य संरक्षित स्मारके म्हणून घोषित केलेल्या स्मारकांपैकी व मंदीर संकुलाच्या अगदी अंतिम टोकाला गिरिशिखरावरील राम मंदिर, लक्ष्मण मंदिर व राम कुंड प्राचिन यादव कालिन स्मारके असून या स्मारकाचा भोसले कालखंडात जिर्णोद्धार झाल्याचे निदर्शनास येते. या स्मारकापर्यंत पोहचण्याकरीता क्रमश: वराह दरवाजा, शिरपूर दरवाजा, भैरव दरवाजा व गोकूळ दरवाजा यांची रचना केल्याचे निदर्शनास येते. अगदी सुरुवातीला वराह दरवाजा असून शेवटच्या गोकूळ दरवाज्याने राम व लक्ष्मण मंदिर परिसर सिमाबद्ध झालेला आहे. नागपूर विभागातील गडमंदिर रामटेक येथील केवल गोकूळ दरवाजा या राज्य संरक्षित स्मारकांच्या जतन व दुरुस्ती कामाचे रु.१,३७,२५,५९०/- इतक्या रकमेचे वास्तुविशारद मे. इंद्रजीत आणि रुपा नागेशकर, कोल्हापूर यांच्याकडून तयार करुन घेण्यात आलेले सविस्तर अंदाजपत्रक सविस्तर अंदाजपत्रक संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांनी सादर केले आहे. त्यानुसार या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन दुरुस्ती कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :-

केवल गोकूळ दरवाजा, रामटेक, जि. नागपूर या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन दुरुस्ती कामाच्या रु.१,३७,२५,५९०/- (अक्षरी रुपये एक कोटी सदतीस लक्ष पंचविस हजार पाचशे नव्वद मात्र) (वस्तु व सेवाकरासह) या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर निधी मागणी क्र. झेडडी-०२, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, २२०५ कला व संस्कृती (००) १०३, पुरातत्वशास्त्र, (०१) (०६) राज्यातील ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्ट्या

महत्वाचे किल्ले व धार्मिक स्थळे यांची जपणूक संरक्षण (कार्यक्रम) २२०५ १३०२ २७ लहान बांधकामे या लेखाशिर्षातील त्या त्या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

०३. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच सदर काम हे पुरातत्वीय निकषानुसार/मानकानुसार पूर्ण होईल हे पाहण्याची जबाबदारी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय व संबंधित संवर्धन वास्तुविशारद यांची राहील.

०४. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र -२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग २, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ६ मधील परिच्छेद क्र. २७(२) "अ" नुसार तसेच वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१२१५४१५७८६२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2024.03.12 15:51:13 +05'30'

**( नंदा राऊत )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. मंत्री (सां.का.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (सां.का.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
उप सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सहायक संचालक, पुरातत्व विभाग, नागपूर.
महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल -२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
जिल्हा कोषाधिकारी, नागपूर.
कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, सां.का.३.